# पोपट आणि चोर



मराठी : गार्गी लागू

कुण्या एके काळी एका गावांत एक माणूस रहात होता. काम धंदा काहीच जमेना. शेवटी तो चोर्या करायला लागला. गावाच्या काहीस दूर एक बंदर होतं, तिथे दूर दूरच्या देशामधून जहाज येत असत. एके दिवशी बंदराजवळ त्याला एका पिंजर्यामधे पोपट मिळाला. त्याने तोच चोरला.

पोपट त्याच्या काहीच कामाचा नव्हता. तरी त्या पोपटाला त्याने ठेऊन घेतलं, कारण तो बोलू शकत होता. चोराला वाटलं की कदाचित याच्याकडून  गुप्त खजिन्याविषयी माहिती मिळेल.



तो पिंजरा उचलून घरी घेऊन आला. त्याच दिवशी त्याने आपल्या शेजार्याची मेंढी चोरली. मेंढी मारून काही मांस त्याने शिजवून खाल्ले आणि उरलेले त्याच्या धान्याच्या कोठारात लपवून ठेवले.



संध्याकाळी शेजारी त्याची हरवलेल्या मेंढीच्या शोधात असतांना त्याने या माणसाला विचारले की त्याने मेंढीला कुठे पाहिलं आहे का? चोराने बघितले नाही असे सांगितले पण पोपट बोलून गेला, "याने मेंढीला मारून टाकले आणि तिचे  काही मांस कोठारांत लपवून ठेवले आहे"....पोपटाला आपल्या पूर्वीच्या मालकाकडे जायचे होते. जहाजावरून प्रवास करायचा होता.

मेंढीचे उरलेले मांस पोपटाने सांगितले त्याठिकाणी बरोबर मिळाले. पण चोर म्हणाला कि, "मी तुझी मेंढी चोरली नाही. हा पोपट नेहमीच खोटं बोलतो."  पोपटाने परत ओरडून म्हणाला, "याने मेंढीला मारून टाकलं आणि मांसाचा काही भाग कोठारांत लपविला."



शेजार्याला कळत नव्हत की कुणाच्या बोलण्यावर विश्वास ठेवावा. पोपटाच्या की त्या माणसाच्या......! तो कोर्टांत गेला. दुसर्या दिवशी सुनावणी ठरली.

त्या रात्री चोराने पोपटाला एका पिंपात ठेऊन पिंपाचे तोंड कापडाने बंद करून टाकले. पूर्ण रात्र तो कपड्यावर पाणी टाकत राहिला. एका काठीने मधून मधून पिंपावर मारत राहिला.
या मारण्यामुळे वादळाच्या गर्जनासारखा आवाज येत राहिला. खरं तर ती एक छान रात्र होती. आकाशांत चन्द्र , तारे लुकलुकत होते. पण पिंपात बंद असलेल्या पोपटाला हे कळतच नव्हते. जेव्हा सूर्योदय झाला तेव्हा चोराने पोपटाला पिंपातून बाहेर काढले. व पिंजर्यात बंद करून त्याला साक्ष देण्यासाठी कोर्टात घेऊन गेला.





कोर्टामधे जेव्हा पोपटाला त्याची साक्ष द्यायला बोलविण्यात आले तेव्हा त्याने तेच पुन्हा सांगितले जे त्याने प्रथम सांगितले होते....." त्याने मेंढीला मारून टाकलं व काही भाग कोठारात लपवून ठेवला " सर्व लोकांनी पोपटाच्या बोलण्यावर विश्वास ठेवला.

पण चोर म्हणाला, "या पोपटाच्या बोलण्यावर विश्वास ठेऊन तुम्ही मला तुरूंगात पाठविणार? मला त्या मेंढीबद्दल काहीच माहिती नाही. याला एखादा दुसरा प्रश्न विचारा. तेयाला विचारा की कालची रात्र कशी होती?"

पोपटाला तोच प्रश्न विचारण्यात आला. आदल्या रात्रीचा ढगांचा गडगडाट, आणि वरून वहात असलेल्या पाण्याची आठवण येऊन पोपट म्हणाला, "काल रात्री खूप मोठा पाऊस आला होता, ढग गडगडत होते."

त्याचे बोलणे ऐकून लोक म्हणाले, "या पक्षाच्या बोलण्यावर नक्कीच विश्वास ठेवता येणार नाही." आणि चोराला सोडून देण्यात आले. चोर पोपटाला घेऊन निघून गेला.

त्या दिवसानंतर चोर आपल्या दुसर्या शेजार्याकडे गेला व त्याचा एक कोंबडा चोरला. कोंबडा मारून त्याचे मांस त्याने शिजवून खाल्ले. कोंबड्याची हाडे आणि पंख घराच्या बाहेर, पंपाजवळ जमिनीत पुरून टाकले.



आपल्या कोंबड्याला शोधत शेजारिण चोराच्या घरी आली व तिने चोराला कोंबडा पाहिलास का? असे विचारले. "मी तुझा कोंबडा पाहिला नाही" चोर म्हणाला. पण त्याचा पोपट बोलला, "त्याने कोंबडा मारून टाकला. आणि शिजवून खाल्ला. हाडं आणि पंख पंपाजवळच्या  जमिनीत पुरून टाकली."

शेजारणीला हाड आणि पंख तिथेच मिळाले जिथे पोपटाने सांगितले होते. पण चोर म्हणाला, "मी कोंबडा चोरला नाही" .....पोपट ओरडला,....." त्याने कोंबडा मारून टाकला. आणि शिजवून खाल्ला. हाडं आणि पंख पंपाजवळच्या  जमिनीत पुरून टाकले."



"हा मूर्ख पोपट फक्त खोटच बोलतो....." चोराने पोपटाची खिल्ली उडवित म्हटले.

शेजारणीला ठरविता येईना की कोण खरे बोलत आहे. ती कोर्टात गेली. दुसर्या दिवशी सुनावणी ठरली.

त्या रात्री चोराने पोपटाला एका पत्र्याच्या डब्यात थोडे पाणी टाकून ठेवले व डब्याचे तोंड कापडाने घट्ट बांधून टाकले. डब्याच्या बाजूला बर्फ पसरला आणि रात्रभर वारा घालीत बसला. बर्फामुळे गार झालेली हवा डब्याच्या तोंडावर बांधलेल्या कापडातून डब्यात जात होती. गार हवेमुळे डब्यातील पाणी गोठायला लागले. खरं तर ती एक छान रात्र होती. आकाशांत चन्द्र , तारे लुकलुकत होते. पण डब्यात बंद असलेल्या पोपटाला हे कळतच नव्हते. सकाळी पोपटाला डब्यातून बाहेर काढले. पोपट तर पूर्ण गारठला होता. ठरल्याप्रमाणे चोर पोपटाला पिंजर्यात घालून कोर्टात गेला.





पोपटाला साक्ष देण्यासाठी बोलाविले गेले. त्याने तेच पुन्हा सांगितले जे त्याने प्रथम सांगितले होते. ."त्याने कोंबडा मारून टाकला. आणि शिजवून खाल्ला. हाडं आणि पंख पंपाजवळच्या जमिनीत पुरून टाकले."

लोकांचा पोपटाचे बोलणे खरे वाटत होते.

पण चोर म्हणाला, "या पक्षावर बोलण्यावर विश्वास ठेवला जाऊ शकत नाही. या पोपटाच्या खोट बोलण्यावरून आपण मला तुरुंगात पाठवू शकत नाही. त्याला काही इतर प्रश्न विचारा. विचारा त्याला की कालची रात्र कशी होती?

पोपटाला तोच प्रश्न विचारण्यात आला. गारठलेली रात्र आठवून पोपट म्हणाला, "रात्री खूप गार वारे वहात होते. आजूबाजूच्या पाण्याचे बर्फ झाले होते."

लोकांनी माना हलवून म्हटलं की या पोपटाच्या बोलण्यावर विश्वास नाही ठेऊ शकत. हा माणूस निर्दोष आहे. आणि त्यांनी चोराला जाऊ दिले. चोर पोपट घेऊन निघून गेला.

त्याच दिवशी त्या माणसाने दुसर्या एका शेजार्याचे डुक्कर चोरले. त्याला मारून काही मांस शिजवून खाल्ले व उरलेले लाकडाच्या वखारीत लपवून ठेवले.

लवकरच तो शेजारी आपल्या डुकराला शोधत आला. त्याने चोराला विचारले की त्याने डुकराला कुठे पाहिले का?

तो म्हणाला, "मी मुळीच पाहिले नाही"  ..... पण पोपट बोलला, "याने डुकराला मारले. त्याचे थोडे मांस शिजवून खाल्ले. व उरलेले वखारीत लपवून ठेवले."

शेजार्याने पाहिलं की चोराने तसच केल होत.....पण चोर म्हणाला, "मी डुक्कर चोरलं नाही. हा मूर्ख पोपट खरे बोलूच शकत नाही.“  पण पोपट परत बोलला, "याने डुकराला मारले. त्याचे थोडे मांस शिजवून खाल्ले. व उरलेले वखारीत लपवून ठेवले."

शेजारी म्हणाला की न्यायालयामधेच याचा निर्णय होईल. दुसर्या दिवशी सुनावणी ठरली.





त्या रात्री चोराने एका मोठ्या भांड्याच्या शेजारी जाळण्यासाठी लाकड जमा केली. त्याच भांड्यात तो पोपटाला ठेवणार होता. रात्रभर तो लाकड जळत ठेवणार होता की पोपट उद्या न्यायालयांत सांगेल की रात्रभर इतके गरम होत होते. इतके गरम की उन्हाळ्यांत ज्या दिवसांत जास्तीत जास्त गरम असते. पण पोपटाने खिडकीतून पाहिल होतं की चोर काय करणार होता. पोपटाच्या लक्षात आल की गेल्या दोन भयानक रात्री काय घडल होत आणि लोक त्याच्या बोलण्यावर विश्वास का ठेवित नव्हते. पोपटाला मूर्ख बनविण्याची सारी तयारी झाल्यावर चोराने पोपटाला पिंजर्यातून बाहेर काढून मोठ्या भांड्यात ठेवले व वर एक झाकण ठेवले. मग त्याने बाजूला ठेवलेल्या लाकडांना आग लावली.  जवळ जवळ एक तास त्याने आग चालू ठेवली आणि मग तो झोपायला गेला. त्या वाटले की उरलेली रात्रभर निखारे जळत रहातील.



भांड्यामधे पोपटाला खूपच गरम होत होत. तो माणूस निघून गेल्याचा आवाज आल्यावर पोपटाने  पोपटाने भांड्याचे झाकण उघडून बाहेर आला. त्याने पाहिले की ती छान रात्र होती. आकाशात चंद्र , चांदण्या चमकत होत्या.

पोपट उडून घराच्या छपरावर आला आणि सारी रात्र तो नाचत होता. त्याच्या खर्या मालकाने त्याला जितके नाच शिकविले होते ते सर्व त्याने केले. चोर जिथे झोपला होता तिथे वर तो पंजाने सारखे छपरावर मारत होता.

सकाळ होण्याआधी तो खाली येऊन भांड्यात बसला आणि झाकण लावून घेतले.

चोर अंमळ जरा उशिरानेच उठला. छतावरून येत असलेल्या आवाजाने त्याला रात्रभर झोप लागली नव्हती. त्याने पोपटाला पिंजर्यात घातले व ते न्यायालयात गेला.





लोकांचा आता पोपटाच्या बोलण्यावर विश्वास नव्हता तरी त्याचे म्हणने  शांतपणे ऐकून घेतले...."याने डुकराला मारले. त्याचे थोडे मांस शिजवून खाल्ले. व उरलेले वखारीत लपवून ठेवले."

मग चोराला आपले म्हणणे सांगण्यासाठी बोलविण्यात आले.

"या मूर्ख पक्षाच्या बोलण्यावरून तुम्ही मला तुरूंगात पाठवू शकत नाही...“ चोर आत्मविश्वासाने बोलत होता, "मला काय माहित डुक्कर लाकडाच्या वखारीत कसा आला.....याला की दुसरे प्रश्न विचारा.....विचारा की कालची रात्र कशी होती. तो सांगू शकला नाही तर त्याच्याच्यावर विश्वास ठेवता येणार नाही."

न्यायालयात विचारल्यावर पोपट म्हणाला, "ती एक छान रात्र होती. आकाशात चंद्र , चांदण्या लुकलुकत होत्या"....

आणि तेच खर होत....



चोराला खूप नवल वाटलं. त्याचा समज होता की रात्रभर भांड्यात गरमीमुळे पोपट हैराण झाला असेल पण तो घाबरला नाही. तो म्हणाला, "पाहिलत, या पक्षाच्या बोलण्यावर विश्वास ठेवला जाऊ शकत नाही. आपल्या सर्वांना माहित आहे की काल रात्री वादळात किती दगड छतावर येऊन पडले. त्यामुळे झोपही झाली नाही.”

त्याचे बोलणे ऐकून न्यायाधीशांना खूप आश्चर्य वाटले. ते सर्व एका सूरांत बोलले की , "याला घेऊन जा व तुरूंगात बंद करा. याच्या बोलण्यावर विश्वास ठेवला जाऊ शकत नाही. हाच खरा चोर आहे."

त्या चोराला तुरूंगात डामलं व लोक त्या पोपटाला बंदरावर घेऊन गेले जिथून त्या माणसाने पोपटाला चोरून आणले होते. नाविक, पोपटाचा मालक, पोपट हरवल्यामुळे दु:खी होता. त्याला त्याचा पोपट मिळाल्यावर तो पोपटाला खांद्यावर बसवून जहाजावर आला. आणि दोघांनी एका नव्या समुद्र यात्रेला सुरवात केली.

समाप्त

